वनोपजाच्या वाहतुकीसाठी निर्गत पास देण्याबाबतची कालमर्यादा ४५ दिवसांवरुन कमी करुन ३० दिवस करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः टिआरएस-०४/२१९/२०१५/प्र.क्र.६९/फ-६**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
तारीख: १ जून, २०१५

वाचा —

**शासन परिपत्रक क्रमांकः टिआरएस १०८९/प्र.क्र. १६७/८९/फ-६, दिनांक १४.५.१९९०**

परिपत्रक—

भारतीय वन अधिनियम, १९२७ च्या कलम ४१ नुसार वनोपजाच्या वाहतुकीसाठी निर्गत पासची आवश्यकता आहे. महाराष्ट्र वन नियमावली २०१४ चे नियम ३२(अ) नुसार मुख्य वनसंरक्षक, उपवनसंरक्षक किंवा मुख्य वनसंरक्षक अथवा उपवनसंरक्षक यांनी लेखी प्राधिकृत केलेले कोणतेही अधिकारी यांना या नियमानुसार पास देण्याचे अधिकार आहेत. महाराष्ट्र वृक्षतोड अधिनियम, १९६४ व त्या अंतर्गत निर्मित महाराष्ट्र वृक्षतोड नियम, १९६७ अन्वये खाजगी क्षेत्रामध्ये वृक्षतोडीनंतर निर्गत पास करीता अर्ज प्राप्त झाल्यावर त्याबाबतचा निर्णय ४५ दिवसांच्या आंत घेण्याबाबत संदर्भाधीन परिपत्रकाद्वारे कालमर्यादा निश्चित करण्यात आली आहे.

आता राज्यात बारामाही रस्त्याचे जाळे तसेच दळणवळणासाठी मोठ्या प्रमाणात साधनांची उपलब्धता झाली आहे, ही बाब लक्षात घेता निर्गत पासकरीता अर्ज प्राप्त झाल्यानंतर ४५ दिवसांच्या आंत निर्णय घेण्याबाबत विहित करण्यात आलेली कालमर्यादा आता ३० दिवस करण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६०११२०३०९९११९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

TIWARI VIRENDRA RAMBAHAL

Digitally signed by TIWARI VIRENDRA RAMBAHAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST,CID - 917243, postalCode=400032, st=Maharashtra, cn=TIWARI VIRENDRA RAMBAHAL
Date: 2015.06.01 12:04:40 +05'30'

**( वीरेंद्र तिवारी )**
मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)
महसूल व वन विभाग

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान सचिव (उद्योग विभाग), मंत्रालय, मुंबई.

३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संरक्षण), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), (सर्व)
५. जिल्हाधिकारी (सर्व)
६. उपवसंरक्षक (सर्व)
७. उपजिल्हाधिकारी (सर्व)
८. फ-६, कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.